ॐ श्रीगणेशाय नमः । कांहीं छिन्नांग असुर । जाऊन वदती समग्र । वृत्तान्त सारा दुःखकर । महाबळी कामासुरासी ।।१।। महाराज काय

राजभवनांत । कैंसे स्वस्थ तुम्ही बसलात । तुमचे दोन्ही पुत्र मृत । रणांगणीं पडले असती ।।२।। आतां शरण जावें त्वरित । त्या विघ्नपदेवा सांप्रत । अन्यथा दैत्यकुळाचा निश्चित । समूळ नाश ओढवेल ।।३।। ऐसें त्यांचें भयभीत वचन । ऐकून मूर्च्छित झाला उन्मन । त्यास दैत्य करिती सावधान । भयसंकुल ते सारे ।।४।। तेव्हां होऊन शोकसंतप्त । देवांसी मारण्या इच्छित । शस्त्रें घेऊनिया अगणित । रथारूढ तैं झाला ।।५।। उरली सुरली सेना घेऊन । कामासुर गेला चाल करून । जेथें होता विकट गजानन । रणभूवरी महावीर ।।६।। त्या रुद्रावतार कामासुरा पाहून । भयभीत झाले देव विषण्णमन । ते विकटासी बोलती वचन । स्वामी आला कामासुर ।।७।। तो महायश स्वयं रणांत । अवतरलासे बळासहित । गणनाथा तूं सांप्रत । जें करायचें तें करी ।।८।। तेव्हां विकट क्रोधयुक्त । बोले देवांसी वचन उत्साहयुक्त। भयहीन होऊन लढा रणांत । माझा अनुग्रह तुम्हांवरी ।।९।। त्याचें ऐकतां समाश्वासन। शंभु विष्णु मुख्य देव प्रसन्न । उत्साहित मनीं होऊन । गर्जना करिती बहुविध तैं ।।१०।। घनगर्जनेसम त्यांची गर्जना । घुमली साऱ्या गगनांत जयभावना । शस्त्रास्त्रें घेऊन करण्या सामना । गेले सारे महेशादी ।।११।। त्यांस दैत्य नायक म्हणत। अत्यंत क्रोधें तो जळत । देवनिषूदन वचन उन्मत्त । म्हणे ऐकारे देवांनो ।।१२।। शंभो विष्णू अन्य देवेशांनो सांप्रत । ऐका सारे एकचित्त । माझे पुत्र वधून साधलेत । वैर तुम्हीं सर्वांनी ।।१३।। मी यापूर्वी स्नेहभावें न वधिलें । दयाभावें रक्षिलें । सुरेश्वरा त्याचें मज लाभलें। पुत्रशोकरूपें आज फळ ।।१४।। सुरांनो तुम्हीं अपकार । केलात घेऊन उपकार । आतां माझा क्रोध अनिवार । वधीन तुम्हां समस्तांसी ।।१५।। देवेंद्रसत्तमांनो विकटासी । मारीन तैसें मुनींसी । ऐसें बोलून धनुष्यासी।

बाण लाविला दैत्येंद्रें ।।१६।। तेव्हां धैर्यभाव धरून । शंकर तयासी बोले वचन । महादैत्या पूर्वी आमुचे धन । सारें तूं हरून नेलें ।।१७।। धर्मनाश करून पीडित । केलेंस त्रैलोक्य दु:खित । त्याचें फळ निश्चित। मिळालें तुजला जाण हें ।।१८।। विकटकृपेनें तुज वधीन । खलोत्तमा हें निश्चित जाण । ऐकून तें शिवाचें वचन । संतप्त झाला कामासुर ।।१९।। गदा घेऊन करांत । शंकरासी तो ताडित । त्या गदाघातें पाडित। शंकरासी रणांगणीं ।।२०।। शंकरास विव्हल मूर्च्छित । पाहतां केशव चक्र सोडित । कामासुरावरी चालून जात । परी तें निष्फळ जाहलें ।।२१।। तेव्हां क्रोधें ज्वलंत । धनुष्य आपुलें सरसावित । कामासुर महाबाण वर्षत । घन जैंसे पर्जन्य ।।२२।। त्या बाणांनी देवमुख्य रणांत। छिन्नांग पडले मूर्च्छित । बलहीन ते समस्त । बळिमुख्य दानवा जोर चढला ।।२३।। ते दुर्मद दानव वधिती । महायोद्धे देवांसी छळिती । विष्णूची बाणगती । तेव्हां पडली कामासुरदेहीं ।।२४।। तोही बाण उग्र सोडित । गरुडध्वजासी करी मूर्च्छित । त्यासमयीं सावध होत । शंकर पुनरपि त्वेषानें ।।२५।। कामासुर त्यास ताडित । खड्गाचा आघात करित । परी जराही न हालत । संहारक शिव तेव्हां ।।२६।। त्या अंतरीं विष्णू होत जागृत । तोही पळे रणांत । भानू रावणासी ताडीत। शराघातें त्या वेळीं ।।२७।। दुर्मदासही तो विद्ध करित । ते दोन्ही असुर मूर्च्छित । महिष कुंभकर्ण रावण होत । विष्णु चक्राघातें बेशुद्ध ।।२८।। बळि दानवही मूर्च्छित । जेव्हां पडला रणांत । तेव्हां गोविंद वधित । असंख्य दानवां शौर्यानें ।।२९।। हाहा:कार करून । असुर धावती भयभीत मन । दशदिशांत तें अघटित पाहून । कामासुरा आश्चर्य वाटे ।।३०।। अत्यंत क्रोधयुक्त होऊन । आपटी महेशातें स्वकरीं धरून । विष्णूसही देत फेकून । महापर्वताच्या शिखरावरी ।।३१।। सूर्यास

धरणींत दडपिलें । तेव्हां देव भयातुर झाले । हाहा:कार ध्वनीनें दाटलें। सर्व रणांगण त्या समयीं ।।३२।। ते छिन्नभिन्न अंगें धावत । कामासुरबाणें हत । दैत्येंद्राचें बळ पाहून हर्षित । विकट तेव्हां स्वयें जाई ।।३३।। मूषकावरी तो बैसला । संग्राम करण्या उद्युक्त झाला। त्यास पाहून कामासुर वदला । महाप्रतापी उन्मत्त ।।३४।। क्रोधें आरक्त त्याचे नयन । म्हणे मयूरेशा तूं अज्ञान । माझ्यासवें लढण्या येऊन । मरण आपुलें निश्चित केलें ।।३५।। तूं उंदरावरी बैसलास । मूषकासम बळयुक्त खास । माझ्या महावीर पुत्रांस । वधिलेंस तूं कपटानें ।।३६।। आतां मीं पुत्रशोकें संतप्त । वधीन तुज मूषकासहित । देवांनी तुज प्रार्थिलें विनत । काय माझें अहित करिसी ।।३७।। माझ्या केवळ भ्रूभंगानें कंपित । सारें चराचर क्षणांत । उत्पत्ति सिथतिसंहारयुक्त । जे जे असती त्रिभुवनीं ।।३८।। त्यांपासून मज भय नसत । तूं तर देहधारी प्रत्यक्षांत गणाध्यक्षा मूर्खासम सांप्रत । अविचारें लढण्या येसी ।।३९।। अज्ञानें जरी तूं युक्त । तरी आज मरशील निश्चित । कामासुराचें वचन ऐकत। तेव्हां गणपति हंसूं लागला ।।४०।। त्या गर्वयुक्त कामासुराप्रत । म्हणे मूर्ख तूंच जगांत । मी विकट असे अद्भुत । जन्ममृत्यूविहीन ।।४१।। महाबळा माझा वध । कैसा करशील तूं निर्बुद्ध । सृष्टिस्थितिसंहारकर्ता निर्वेध । दैत्यपुंगवा मीच असे ।।४२।। जरी तुज जीविताची आशा । तरी शरण ये दैत्येशा । अन्यथा पापकर्म्या हताशा । वधीन तुज नि:संशय ।।४३।। गर्व सोड महामूर्खा मी वर्तत । ब्रह्म परम आद्यन्तवर्जित । शुक्रें तुज कथिलें समस्त । रहस्य परी न ऐकलेंस ।।४४।। तूं मूर्खभावें अव्हेरिला । शुक्रगुरूचा उपदेश भला । अद्यापि जाणून मजला । शरण येई महा असुरा ।।४५।। विकटाचें ऐकून वचन । कामासुर क्रोधें संतप्तमन । धावला गदा घेऊन । दारुण आघात करितसे ।।४६।। ती

गदा निष्प्रभ पडत । धरणीतलावरी अकस्मात । दैत्यराज झाला मुर्च्छित। एका प्रहरें सावध झाला ।।४७।। तेव्हां तो महाक्रूर अनुभवित । अति दारुण पीडा सर्वांगांत । अशक्त झाला अत्यंत । विचार करी स्वमानसीं ।।४८।। अहो शस्त्रावांचून मजप्रत । विकटें कैसा केला आघात । शक्तिहीन झालों अत्यंत । युद्ध कैसें करूं आतां ।।४९।। शुक्रानें जैसें कथिलें । तें सारें सत्य जाहलें । ब्रह्मरूप हें अवतरलें । विकटरूप गजानन ।।५०।। तथापि देव पक्षपाती । कैसा ब्रह्म हा गणपति । म्हणोनि संशय मम चित्तीं । शरण यासी न जाईन ।।५१।। मी मरेन रणांगणांत। तेच कीर्तिवर्धक निश्चित । शत्रूंस शरण जाणें नसत । योग्य कदापि वीरासी ।।५२।। ऐसा विचार करून । म्हणे मी जाईन याच क्षण । विकटासी विचारीन । प्रश्न माझा हा अद्भुत ।।५३।। जरी देवांचा पक्ष सोडशील । तरी मीं शरण तुज सबल । अन्यथा युद्धांत होईल । निर्णय आपुल्या बळाचा ।।५४।। ओमिति श्रीमदान्त्ये पुराणोपनिषदि श्रीमन्मौद्गले महापुराणे षष्ठे खंडे विकटचरिते कामासुरविचारवर्णनं नाम चतुस्त्रिंशत्तमोऽध्यायः समाप्तः । श्रीगजाननार्पणमस्तु ।

(अध्याय चौतिसांवा संपूर्ण)